<u>प्रशासकीय मान्यता देणेबाबत</u>.

राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियान (एनएमअेइटी) अंतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (एसएमएसपी) या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत बीज ग्राम कार्यक्रमासाठी सन २०१६-१७ मध्ये सर्वसाधारण संवर्गाकरीता असलेला अखर्चित निधी सन २०१७-१८ मध्ये खर्च <u>करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत</u>.

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: बियाणे १०१७/प्र.क्र.८१/१अे**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २३ ऑगस्ट, २०१७.

<u>वाचा</u> :- १) केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्राज्ञान अभियान (एनएमअेइटी) अंतर्गत बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (एसएमएसपी) बाबतच्या मार्गदर्शक सूचना.

२) केंद्र शासनाचे क्रमांक No.12-01/2015, S.D.-I, दिनांक ०९.११.२०१५ रोजीचे पत्र.

३) केंद्र शासनाचे निधी वाटपाबाबतची पत्रे क्र.१०-५/२००९-SD.VI, दि.२६.जुलै,२०१६.

४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक योजना ३३१६/प्र.क्र.१४५/१अे, दिनांक ०७ ऑक्टोबर, २०१६.

५) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक पुनर्वि-२०१७/प्र.क्र.२५/१७/२अे/(९), दिनांक ०६ फेब्रुवारी, २०१७.

६) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक योजना ३३१६/प्र.क्र.१५७/१अे, दिनांक १३ फेब्रुवारी, २०१७.

<u>**प्रस्तावना :-**</u>

राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियानांतर्गत (NMAET) बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (SMSP) या केंद्र पुरस्कृत योजनेतील बीज ग्राम कार्यक्रम सन २०१६-१७ मध्ये राज्यात राबविण्यासाठी केंद्र व राज्य हिस्सा ६०:४० या प्रमाणे केंद्र हिस्सा रूपये ६००/- लाख व राज्य हिस्सा रूपये ४००/- लाख, असे एकूण रूपये १०००/- लाख (रूपये एक हजार लाख) एवढ्या रकमेस दिनांक ०७ ऑक्टोबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली होती.

२. सदर योजनेत बीज ग्राम कार्यक्रमाकरीता (केंद्र हिस्सा ६० टक्के) सर्वसाधारण शेतकऱ्यांकरीता रूपये ४४४/- लाख, अनुसुचित जातीच्या शेतकऱ्यांसाठी रूपये ९६/- लाख आणि अनुसूचित जमातीच्या शेतकऱ्यांसाठी रूपये ६०/- लाख असे एकूण रूपये ६००/- लाख केंद्र शासनाने महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज) अकोला यांना थेट उपलब्ध करून दिलेले आहेत. त्याप्रमाणात राज्य हिस्सा रूपये ४००/- लाख असून संवर्गनिहाय तपशील सर्वसाधारण संवर्गासाठी रूपये २९६/-लाख, अनुसूचित जाती संवर्गासाठी रूपये ६४/- लाख आणि अनुसूचित

जमाती संवर्गासाठी रूपये ४०/- लाख असा होता. सदर योजनेकरीता दिनांक ०७ ऑक्टोबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आलेली होती.

३. सदर बीज ग्राम योजनेतील राज्य हिस्सा सर्वसाधारण घटकातील मंजूर तरतूद रू.२९६/- लाख ही (लेखाशिर्ष २४०१ अे १५४ ) कृषि आयुक्तालयामार्फत महाबीजला उपलब्ध करून देण्यात आलेली होती. सदर तरतूदीपैकी रू.२६८.५४४/- लाख एवढा प्रत्यक्ष खर्च झालेला असून रू.२७.४५६/- लाख इतका निधी हा महाबीजकडे अखर्चित आहे. सदर घटकासाठी केंद्र शासनाकडून प्राप्त रू.४४४/- लाख पैकी रू.४०२.८१५/- लाख इतका निधी खर्च झाला असून रू.४१.१८५/- लाख इतका निधी अखर्चित आहे.

४. तसेच अनुसूचित जाती घटकासाठी राज्य हिस्सा मंजूर तरतूद रू.६४/- लाख पैकी (लेखाशिर्ष २४०१ अे ३३२) रू.५१.२०/- लाख उपलब्ध करून देण्यात आले होते. उर्वरित रू. १२.८० लाख हे लाभार्थी उपलब्ध नसल्यामुळे महाबीजने सदर अनुदान आवश्यक नसल्याचे कळविले होते. सदर उपलब्ध तरतूदीपैकी महाबीजकडून रू.३२.८८४/- लाख खर्च झालेला असून रू.१८.३१६/- लाख इतका निधी महाबीजकडे सद्यस्थितीत अखर्चित आहे. सदर घटकासाठी केंद्र शासनाकडून प्राप्त रू.९६.००/- लाख पैकी रू.४९.३२६/- लाख इतका निधी खर्च झाला असून रू.४६.६७४/- लाख एवढा निधी अखर्चित आहे.

५. अनुसूचित जमाती या घटकासाठी केंद्र शासनाकडून रू.६०/- लाख व त्यास अनुसरून राज्य हिस्सा लेखाशिर्ष (२४०१ अे ६३७) रू.४०/- लाख इतका निधी बीज ग्राम या कार्यक्रमासाठी उपलब्ध करून देण्यात आलेला होता. सदर घटकासाठी लाभार्थी उपलब्ध झाल्यामुळे केंद्र हिस्सा व राज्य हिश्श्याची रक्कम पुर्णपणे खर्च झालेली आहे.

६. यास अनुसरून सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी सर्वसाधारण संवर्गासाठी या कार्यक्रमांतर्गत केंद्र हिस्स्याचा अखर्चित निधी सन २०१७-१८ मध्ये खर्च करण्यास दिलेली परवानगी विचारात घेता, सर्वसाधारण घटकाकरीता केंद्र हिस्सा रु.४१.१८५/- लाख व त्यास समरुप राज्य हिस्सा रू.२७.४५६/- लाख असा एकूण रू.६८.६४१/- लाख निधी सन २०१७-१८ मध्ये खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१६-१७ या वित्तीय वर्षामध्ये बीज ग्राम कार्यक्रमाकरीता केंद्र हिस्सा व राज्य हिश्याची सर्वसाधारण संवर्गासाठी उपलब्ध करून देण्यात आलेल्या निधीपैकी केंद्र हिस्सा (अखर्चित) रु.४१.१८५/- लाख व त्यास समरुप राज्य हिस्सा (अखर्चित) रू.२७.४५६/- लाख अशी एकूण अखर्चित रक्कम रू.६८.६४१/- लाख (रूपये अडुसष्ठ लाख चौसष्ठ हजार शंभर फक्त) महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित (महाबीज), अकोला यांना सन २०१७-१८ मध्ये खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सूचनांनुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेऊन सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावीत.

३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चीत रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरूपात रकमा विचारात घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

५) कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

६) कृषि विभागाच्या थेट लाभ हस्तांतरण (DBT) धोरणान्वये वैयक्तिक लाभ देणे बंधनकारक राहील.

२. सदर योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व सहाय्यक संचालक, लेखा १ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. वित्त विभागाच्या दिनांक १८.४.२०१७ व दिनांक ३०.६.२०१७ रोजीच्या परिपत्रकातील अटींची पूर्तता करण्यात यावी. तसेच सदर आदेश वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.२५३/अर्थ-१३, दिनांक ०६.०७.२०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२३१२४०२८११०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2017.08.23 12:31:03 +05'30'

(उ.ना.चांदिवडे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ,मर्यादित, महाबीज भवन, कृषिनगर, अकोला.
६. संचालक (नि. व गु.नि.) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

७. महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर .
८. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला.
११. उप सचिव (२-अे) , कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.सह सचिव (नि. व गु.नि.) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४.कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.वित्त विभाग (व्यय-१४) मंत्रालय, मुंबई.
१६.निवडनस्ती (कार्यासन १-अे) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.